**शैक्षणिक वर्ष २०२५-२६ करीता नवीन विधी महाविद्यालयाच्या अंतिम मान्यतेस मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :HTED-२९०१०/३५/२०२४/८५८९७२-MHT-(HE-४)**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ६ मार्च, २०२५.

**संदर्भ:** १. शासन निर्णय , उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.एनजीसी -२०१७/ (२९/१७)/मशि-४, दिनांक १५.०९.२०१७.
२. शासन निर्णय , उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. एनजीसी-२०२२/ (५४/२२)/मशि-४, दिनांक ०१.०९.२०२२.
३. रिट याचिका क्र. ८८९९/२०२३ जोग एज्युकेशन सोसायटी विरुद्ध महाराष्ट्र शासन प्रकरणी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ मुंबई यांनी दिलेले आदेश दि. १८.०७.२०२३.
४. भारतीय विधिज्ञ परिषदेचे पत्र क्र.BCI १७१२:२०२४(LE/std.०३.०९.२०२४) दि.१८.०९.२०२४.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ आणि संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णय दिनांक १५.०९.२०१७ अन्वये विहित केलेल्या निकष व कार्यपद्धतीनुसार, संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये शैक्षणिक वर्ष २०२२-२३ पासून खालील विवरणपत्रात नमूद महाविद्यालयास अंतिम मान्यता देण्यात आलेली आहे.

| अ.क्र. | क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नाव | विद्याशाखा/अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| | | **मुंबई विद्यापीठ, मुंबई** | |
| **१.** | १. | लिला एज्युकेशन सोसायटी संचलित प्रा. मंजूनाथ आचार्य कॉलेज ऑफ लॉ, वीराचार्य टेक्नीकल एज्युकेशन कॅम्पस, शैलू रेल्वे स्टेशन समोर, ता. कर्जत, जि. रायगड | विधी ३ वर्षे (०-६०)<br>विधी ५ वर्षे (०-६०) |

संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये नमूद केलेल्या अटी व शर्तीनुसार उपरोक्त विवरणपत्रातील महाविद्यालय शैक्षणिक वर्ष २०२२-२३ अथवा २०२३-२०२४ मध्ये सुरू करणे अभिप्रेत होते. परंतु, भारतीय विधीज्ञ परिषदेची मान्यता विलंबाने प्राप्त झाल्यामुळे महाविद्यालय विहित कालमर्यादेत सुरू झाले नाही. आता, लिला एज्युकेशन सोसायटी संचलित प्रा. मंजूनाथ आचार्य कॉलेज ऑफ लॉ, वीराचार्य टेक्नीकल एज्युकेशन

कॅम्पस, शैलू रेल्वे स्टेशन समोर, ता. कर्जत, जि. रायगड या महाविद्यालयास भारतीय विधीज्ञ परिषदेने संदर्भ क्र. ४ येथील दिनांक १८.०९.२०२४ रोजीच्या पत्रान्वये मान्यता दिली आहे.

रिट याचिका क्र. ८८९९/२०२३ जोग एज्युकेशन सोसायटी विरुद्ध महाराष्ट्र शासन प्रकरणी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ मुंबई यांनी दिनांक १८.०७.२०२३ रोजी दिलेले आदेश तसेच सदर प्रकरणामध्ये भारतीय विधीज्ञ परिषदेची मान्यता देण्यास झालेला विलंब विचारात घेऊन, लिला एज्युकेशन सोसायटी संचलित प्रा. मंजूनाथ आचार्य कॉलेज ऑफ लॉ, वीराचार्य टेक्नीकल एज्युकेशन कॅम्पस, शैलू रेल्वे स्टेशन समोर, ता. कर्जत, जि. रायगड या महाविद्यालयास संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये **कायम विनाअनुदान तत्वावर** दिलेल्या **अंतिम मान्यतेस शैक्षणिक वर्ष २०२५-२६ करीता** मुदतवाढ देण्यात येत आहे.

संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयांन्वये नमूद केलेल्या अटी व शर्तीमधील अट क्र.९ वगळता उर्वरित सर्व अटी व शर्ती संबंधित अंतिम मान्यतेच्या अनुषंगाने लागू राहतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३०६१५०३५९०७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK SHANKAR MANDE

Digitally signed by ASHOK SHANKAR MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK SHANKAR MANDE
Date: 2025.03.06 15:04:54 +05'30'

**(अशोक मांडे)**
**उप सचिव, महराष्ट्र शासन**

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री ,उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. राज्य मंत्री ,उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) आयुक्त, राज्य सामायिक प्रवेश परीक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९) कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
१०) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, पनवेल.
१२) निवडनस्ती (मशि-४).